**<u>राज्यातील नागरी सहकारी बँकांमधील नोकरभरती प्रक्रिया ऑनलाईन पध्दतीने राबविणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन आदेश क्र. युआरबी १८१८/प्र.क्र.९/ शिकाना /७-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :-२१ जानेवारी, २०१९

<u>वाचा :</u>- १) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे परिपत्रक दिनांक ११.२.२०११ , दिनांक १७.३.२०११. व दिनांक ६.२.२०१४
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.ना.बँका/१सआ ना.बँका/ नोकरभरती प्रक्रिया / २०१८, दिनांक ७.४.२०१८
३) महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७९ अ

**शासन आदेश:-**

ज्याअर्थी, संदर्भ क्र१. अन्वये सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी राज्यातील सर्व नागरी सहकारी बँकांना स्टाफिंग पॅटर्न निश्चित करुन सेवक भरतीबाबत कार्यवाही करण्याबाबतच्या सुचना दिलेल्या आहेत.

ज्याअर्थी, राज्यातील नागरी सहकारी बँकांपैकी काही बँकांनी संदर्भ क्र.१ मध्ये नमुद केलेल्या कार्यपध्दतीनुसार आपल्या बँकेचा स्टाफिंग पॅटर्न निश्चित करुन सेवकभरती प्रक्रिया राबविलेली आहे. परंतु अशी भरती प्रक्रिया राबवित असताना ऑफलाईन पध्दतीने परीक्षा व परिक्षोत्तर टप्प्यात काही बँकांच्या संदर्भात गंभीर स्वरुपाच्या तक्रारी प्राप्त झालेल्या आहेत. सदर तक्रारींच्या अनुषंगाने प्राथमिक चौकशीअंती सदर प्रकरणात भरतीची प्रक्रीया प्रामाणिक, निष्पक्ष व पारदर्शक पध्दतीने झाली नसल्याचे निदर्शनास आले आहे. या सदोष भरती प्रक्रीयेमुळे बँकांच्या प्रशासनावर अनिष्ट परिणाम होऊन बँकेवर विश्वास ठेऊन गुंतवणूक करणाऱ्या ठेवीदारांच्या हितास बाधा पोहचण्याची शक्यता नाकारता येत नाही.

ज्याअर्थी, बँकिंग क्षेत्रातील बदलती स्थिती, तांत्रिकदृष्टया कुशल अधिका-यांची आवश्यकता तसेच सद्यस्थितीत स्पर्धात्मक बँकिंग व्यवसायामध्ये बँकिंगचा आत्मा असलेला गुणवत्तापुर्ण सेवक वर्ग सहकारी बँकांमध्ये भरती होणे अनिवार्य आहे.

ज्याअर्थी, लोकहिताच्या दृष्टीने तसेच सक्षम सेवकवर्ग यांच्यामार्फत नागरी सहकारी बँकांचे कामकाज कार्यक्षम व निर्विवाद पध्दतीने हाताळण्यासाठी पारदर्शक, निष्पक्ष व विश्वासार्ह भरती प्रक्रिया राबविणे

अत्यावश्यक झाले आहे. याकरिता, आतापर्यंतचे अनुभव लक्षात घेता लोकहिताच्या दृष्टीने ऑफलाईनच्या ऐवजी ऑनलाईन पध्दतीने भरती प्रक्रिया राबविण्यासंबंधी आदेश देणे आवश्यक झाले आहे.

त्याअर्थी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम ,१९६० चे कलम ७९ (अ ((१) नुसार शासनास असलेल्या अधिकारान्वये राज्यातील सर्व नागरी सहकारी बँकांना लोकहितार्थ शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे:-

**१. नोकरभरती प्रक्रिया फक्त ऑनलाईन पध्दतीने करणे :-**

राज्यातील सर्व नागरी सहकारी बँकांनी ऑनलाईन पद्धतीने नोकरभरती प्रक्रीया राबविणे बंधनकारक आहे.

**२. नागरी सहकारी बँकांची सेवकभरती करणेसाठी त्रयस्थ संस्थेची नियुक्ती करणे :-**

भरती प्रक्रीया राबविण्यासाठी संबंधित बँकांनी विश्वासार्हता, भरती प्रक्रिया राबविणेची क्षमता व अनुभव असलेल्या नोंदणीकृत नामांकित संस्थांना निमंत्रण देऊन त्यांच्यापैकी खालीलप्रमाणे अर्हता धारण केलेल्या संस्थेची नियुक्ती करावी :-

i ) नागरी सहकारी बँकांची सेवकभरती बँकींग भरती परिक्षा घेणारे केंद्र शासनाचे अंगिकृत उपक्रम उदा. १) इंडियन बँकींग पर्सनल सिलेक्शन बोर्ड (IBPS) २) वैकुंठ मेहता नॅशनल इन्स्टीट्यूट ऑफ को-ऑपरेटीव्ह मॅनेजमेंट, पुणे (VANICOM) ३) इंडीयन इन्स्टीट्यूट ऑफ बँकींग ॲण्ड फायनान्स, मुंबई ४) धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर किंवा बँकींग भरती परिक्षा घेणाऱ्या केंद्र शासनाच्या तत्सम संस्था अथवा बँकींग भरती परिक्षा घेणाऱ्या केंद्र शासन अंगिकृत उपक्रम असलेल्या संस्थांमार्फत करण्यात यावी.

ii) नोकर भरतीची प्रक्रिया राबविणा-या संस्थेमध्ये संबंधित नागरी सहकारी बँकेचे अध्यक्ष / संचालक मंडळ तसेच, बँकेचे अधिकारी / कर्मचारी यांचे अथवा त्यांच्या नातेवाईकांचे हितसंबंध गुंतलेले नसावेत. याबाबतची आवश्यक दक्षता घेणे आणि त्यासाठी उपाययोजना करावयाचे कर्तव्ये व जबाबदारी बँकेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.

iii) सदर सेवक भरतीसाठी नियुक्त करण्यात येणा-या संस्थेने या अगोदर किमान पाच राष्ट्रीयकृत बँका /नागरी सहकारी बँका / scheduled खाजगी बँका/ शासनातील विविध विभागांसाठी नोकर भरतीची ऑनलाईन प्रक्रिया राबविलेली असावी. संस्थेची निवड करतांना बँकांच्या गरजांनुसार परीक्षा राबविण्याची क्षमता व मनुष्यबळ उपलब्ध असलेल्या संस्थेचा प्राधान्याने विचार करावा.

iv) सदर संस्थेविरुध्द यापुर्वी कोणत्याही नोकरभरतीच्या अनुषंगाने प्राप्त झालेल्या तक्रारींच्या चौकशीमध्ये सदरची संस्था परीक्षेसंबंधी गलथान व्यवस्थापन, भ्रष्टाचार, गुन्हेगारी पध्दतीचा हस्तक्षेप इ. बाबतीत दोषी असल्याचे सिध्द झालेले नसावे किंवा सदर संस्थेला (नोकरभरतीच्या अनुषंगाने ) काळया यादीत (Black list) समावेश केलेले नसावे.

**३. नागरी सहकारी बँकेमार्फत करावयाची कार्यवाही :-**

लोकहितासाठी व बँकेचे व्यवस्थापन कार्यक्षम होण्याच्या दृष्टीने निर्विवाद व पारदर्शकपणे नोकर भरतीची प्रक्रिया राबविण्याची प्रमुख जबाबदारी बँकेची राहील. यासाठी बँकेने काही प्रमुख जबाबदा-या खालीलप्रमाणे पार पाडाव्यात.

i) वर नमूद केल्याप्रमाणे सक्षम संस्थेची निवड व नियुक्ती संचालक मंडळाच्या मान्यतेने करावी.

ii) सदर संस्थेची नियुक्ती बँकेनेच केलेली असल्याने सदर संस्थेच्या कामासंबंधी वाद व तक्रारी उद्भवल्यास त्याची दखल घेऊन आवश्यक कार्यवाही करण्याची जबाबदारी बँकेचीच आहे.

नोकर भरती प्रक्रिया राबवितांना कोणत्याही टप्प्यावर संस्थेने स्वत: होऊन अथवा बँकेच्या दबावाखाली येऊन भ्रष्ट मार्गाचा अवलंब केल्याचे निदर्शनास आल्यास नियमानुसार योग्य ती तपासणी / चौकशी करुन आवश्यकतेप्रमाणे भरती प्रक्रिया रद्द / स्थगित करण्याबाबत तसेच आवश्यकतेप्रमाणे संबंधित संस्थेविरुध्द फौजदारी स्वरुपाची कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित बँकेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील. तथापि नोकरभरतीबाबत गंभीर स्वरुपाचे आक्षेप असतील आणि संबंधीत बँकेने त्याबाबत कार्यवाही केली नाही तर फौजदारी स्वरुपाची कार्यवाही संबंधीत बँकेचे निबंधक करतील.

iii) संबंधित बँकेने त्यांना लागू असलेल्या आरक्षणानुसार नोकर भरतीची प्रक्रिया पार पाडावी व त्यानुसारच मुलाखतीसाठी किंवा नियुक्तीसाठी पात्र उमेदवारांची निवड यादी उपलब्ध करुन देण्याचे निर्देश संबंधित संस्थेस देणे आवश्यक राहील.

iv) बँकेने नोकर भरती करावयाच्या पदांपैकी नियुक्तीपूर्वी मुलाखत घेण्यासाठी आवश्यक असलेली व नसलेली पदे चिन्हांकित करुन त्याबाबत संस्थेस स्पष्ट निर्देश दयावेत. मुलाखत घेणे आवश्यक असलेल्या पदांबाबत रिक्त पदांच्या १:३ याप्रमाणे उमेदवारांची निवड यादी मागवून मुलाखत प्रक्रिया पार पाडावी. मुलाखतीसाठी ऑनलाईन परिक्षा व मौखिक परिक्षेसाठी गुणांचे ९०:१० असे प्रमाण ठेवावे.

v) रिक्त पदांच्या भरतीसाठी प्रत्येक संवर्गाची अंतीम गुणवत्ता यादी तयार करण्यात यावी. सदर अंतीम यादीनुसार भरावयाच्या रिक्त पदांच्या २०% पात्र उमदेवारांची प्रतिक्षा यादी संस्थेकडून उपलब्ध करुन घ्यावी. ही यादी नियुक्तीच्या प्रथम आदेशापासून ३६५ दिवसांपर्यंत अमलात राहील.

vi) अंतिम निवड यादी प्राप्त झाल्यानंतर सर्व औपचारीकता व तपासणीच्या अधिन राहून पात्र उमेदवारांना नियुक्ती देण्याबाबतची कार्यवाही बँकने करावी.

vii) परिविक्षाधीन कालावधी समाप्त करणे व सेवेत कायम करणे या बाबी संबंधीत बँकेच्या सेवानियमाशी सुसंगत असाव्यात.

**४. नोकरभरती प्रक्रियेबाबतची कार्यपध्दती :-**

संचालक मंडळाच्या ठरावाद्वारे पात्र संस्थेची नियुक्ती बँकेने केल्यानंतर सदर संस्थेशी करार करावा व अशा संस्थेमार्फत खालील पध्दतीने भरती प्रक्रिया राबविण्यात यावी.

i) बँकेने निर्देशित केल्याप्रमाणे नोकरभरती संबंधी ऑनलाईन परिक्षेची जाहिरात देण्यापासून उमेदवाराची अंतिम निवड यादी प्रसिध्द करेपर्यंतची सर्व प्रक्रिया ही संस्थेने पुर्ण करावी.

ii) बँकेने नियुक्त केलेल्या संस्थेने सेवकभरतीच्या अनुषंगाने ऑनलाईन परिक्षेबाबतची माहिती होण्यासाठी संक्षिप्त स्वरुपात जाहिरात ही एका राज्यस्तरीय वर्तमानपत्रात तसेच बँकेचे कार्यक्षेत्र असलेल्या मुख्य जिल्हयातील एका सर्वाधिक खपाच्या मराठी वर्तमानपत्रात द्यावी. तसेच, याबाबतची व परिक्षेच्या संदर्भात सविस्तर माहिती संस्थेच्या व बँकेच्या संकेतस्थळावर देखील ठेवण्यात यावी.

iii) सदर जाहीरातीस अनुसरुन संस्थेने उमेदवारांचे अर्ज हे संपुर्ण ऑनलाईन पध्दतीने घ्यावेत.

iv) ऑनलाईन पध्दतीने अर्ज प्राप्त झालेल्या उमेदवारांची परीक्षा घेणे व त्यासाठी आवश्यक असणारी सर्व व्यवस्था व सुविधा उपलब्ध करण्याची जबाबदारी ही संस्थेची राहील.

v) प्रश्नपत्रिकेचे स्वरुप बहुपर्यायी असावे.

vi) परिक्षा संपल्यानंतर उत्तर तालिका तीन तासाचे आत प्रसिध्द करावी . सदर उत्तरांबाबत व परिक्षेच्या प्रक्रियेबाबत परिक्षार्थींचे आक्षेप परीक्षेच्या दिनांकापासून तीन दिवसांत संस्थेकडे मागविण्यात यावेत.

vii) संस्थेकडे प्राप्त आक्षेपांवर आवश्यक ती कार्यवाही करुन परीक्षा संपल्यापासून जास्तीत जास्त ५ दिवसांच्या आत सुधारीत / अंतिम उत्तरतालिका (Answer Key) संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

viii) अंतिम उत्तरतालिका प्रसिध्द केल्यानंतर मुलाखत घेणे आवश्यक असलेल्या व नसलेल्या पदांसाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी .

**अ) मुलाखत घ्यावयाच्या नसलेल्या पदांसाठी करावयाची कार्यवाही :-**

अंतिम उत्तरतालिका प्रसिध्द केल्यानंतर त्याच दिवशी किंवा जास्तीत जास्त एक दिवसात बँकेच्या निर्देशानुसार लेखी परिक्षेमध्ये उमेदवारास मिळालेल्या गुणानुसार अंतिम निकाल संस्थेच्या / बँकेच्या संकेतस्थळावर संस्थेमार्फत प्रसिध्द करण्यात येईल. अशा अंतिम यादीमध्ये भरावयाच्या रिक्त पदांच्या २०% उमेदवारांची प्रतिक्षा यादी देखील प्रसिध्द करण्यात येईल. या यादीच्या २ प्रती संस्थेमार्फत संबंधित बँकेस पासवर्ड संरक्षित पध्दतीने उपलब्ध करुन देण्यात येतील. प्रसिध्द केलेल्या यादीमधील उमेदवारांना त्यांच्याकडील असलेल्या विविध प्रमाणपत्रांची शहानिशा करुन नियुक्तीचे आदेश बँकेमार्फत देण्यात येतील. याबाबतचा उल्लेख संकेतस्थळावर प्रसिध्द केलेल्या यादीत देखील करण्यात यावा.

आ) मुलाखत घ्यावयाच्या असलेल्या पदांसाठी करावयाची कार्यवाही :-

i) बँकेच्या निर्देशानुसार ज्या सेवक वर्गासाठी मौखिक मुलाखतीची प्रक्रिया घ्यावयाची आहे अशा उमेदवारांच्या बाबतीत अंतिम उत्तरतालिका प्रसिध्द झाल्यानंतर त्यांचे निकाल तयार ठेऊन त्याबाबतची माहिती बँकेस दयावी व ऑनलाईन पध्दतीने मुलाखतीचा दिनांक, वेळ व ठिकाण याची माहिती संस्थेने संबंधित बँकेकडून घ्यावी.

ii) बँकेकडून याबाबतची माहिती / तपशील मिळाल्यावर संस्थेने मुलाखतीच्या तपशीलासह लेखी परिक्षेतील निवड झालेल्या उमेदवारांची आसन क्रमांक निहाय ( गुण क्रमांक निहाय नव्हे ) यादी व मुलाखतीचे पत्र बँकेच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करावे. सदर निवड यादी रिक्त पदांच्या १:३ या प्रमाणे असावी व मुलाखतीसाठी एका दिवसात १०० पेक्षा जास्त उमेदवार बोलविण्यात येणार नाही या पध्दतीने मुलाखतींच्या तारखांचे नियोजन करावे.

iii) निवड यादीतील उमेदवारांनी मुलाखतीचे पत्र संस्था/ बँकेच्या पोर्टलवरुन डाऊनलोड करावे व असे मुलाखतीचे पत्र डाऊनलोड करण्यास उमेदवारांस अडचण निर्माण झाल्यास संस्थेने / बँकेने यासाठी हेल्पलाईनची सुविधा ठेवावी व गरज पडल्यास अशा उमदेवारास मुलाखतीचे पत्र मुलाखतीच्या ठिकाणी उपलब्ध करुन देण्याची सुविधा असावी.

iv) मौखिक परिक्षेसाठी मुलाखतीचे पॅनेल संबंधित बँकेचेच असेल. मात्र मुलाखतीच्या पॅनेलवर असणा-या व्यक्तीच्या कुटूंबातील / नात्यातील कोणताही उमेदवार मुलाखतीसाठी पात्र असल्यास संबंधित व्यक्तीने सदर मुलाखतीच्या प्रक्रियेत सहभागी होऊ नये. या बाबतची आवश्यक दक्षता घेणे आणि त्यासाठी उपाययोजना करावयाचे कर्तव्ये व जबाबदारी बँकेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.

v) वर नमूद केल्याप्रमाणे ऑनलाईन व मौखिक परिक्षेचे गुण ९०:१० या प्रमाणात अनिवार्य असल्याने मौखिक परिक्षेसाठीच्या गुणांपैकी ५ गुण संबंधित उमेदवाराच्या शैक्षणिक

पात्रतेबाबत असतील व उर्वरित ५ गुण मौखिक मुलाखतीसाठी असतील. शैक्षणिक पात्रतेबाबतच्या गुणांचे विभाजन बँकेच्या संचालक मंडळाच्या मान्यतेने ठरविल्याप्रमाणे राहतील.

vi) मुलाखतीमध्ये उमेदवारास देण्यात आलेल्या गुणांचा तपशील संबंधित बँकेने संस्थेस पासवर्ड संरक्षित पध्दतीने संस्थेच्या गरजेनुसार स्मृतीशलाका ( पेनड्राईव्ह ), सी डी इत्यादी माध्यमाव्दारे पाठवावा.

vii) बँकेकडून मौखिक परिक्षेमध्ये (मुलाखत) मिळालेल्या व ऑनलाईन परिक्षेमधील गुणांच्या आधारे संस्थेने अंतिम गुणवत्ता यादी तयार करावी व गुणवत्तेनुसार क्रम दर्शवून गुणांसह अंतिम निवड यादी २०% उमेदवारांच्या प्रतिक्षा यादीसह संस्था / बँकेच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करावी. याप्रमाणे प्रसिध्द केलेली अंतिम निवड यादी पासवर्ड संरक्षित पध्दतीने संस्थेने संबंधित बँकेस (दोन प्रतीमध्ये), संबंधीत बँकेच्या निबंधकास व संबंधित जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था यांना दयावी. सदर प्रतिक्षा यादीची मुदत ही निवड झालेल्या उमेदवारांना बँकेमार्फत नियुक्ती आदेश दिल्याच्या दिनांकापासून जास्तीत जास्त एक वर्ष इतकी राहील.

viii) संस्थेकडून प्राप्त झालेल्या सदर अंतिम निवड यादीप्रमाणे गुणवत्ता यादीप्रमाणे संबंधित पदावर नेमणूकीचे आदेश काढणे बँकेवर बंधनकारक राहील.

५. परिक्षेसंदर्भातील सर्व रेकॉर्ड (कागदपत्रे) व त्यांची Soft Copy निकालानंतर संस्थेने बँकेकडे सुपूर्द करावी. असे रेकॉर्ड संबंधित संस्थेने व बँकेने परीक्षेच्या निकालानंतर सिलबंद लिफाफ्यामध्ये किमान दोन वर्षापर्यंत जतन करावे. यासंबंधी बँकेकडील रेकॉर्ड ( हार्ड व सॉफ्ट कॉपी ) किमान पाच वर्ष अथवा न्यायालयीन प्रकरणाचा अंतिम निकाल लागेपर्यत जतन करण्याची जबाबदारी बँकेची राहील. अशा प्रसंगी सदर रेकॉर्ड आवश्यकतेप्रमाणे दोन वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी जतन करुन ठेवण्यास बँकेमार्फत संस्थेस निर्देश देणे आवश्यक राहील. त्याचप्रमाणे, संबंधित रेकॉर्ड निबंधकाच्या सुचनेप्रमाणे तपासणीसाठी सादर करणे बँक/संस्थेवर बंधनकारक राहील. सदर आदेशातील वरील सर्व निर्देशांच्या अधीन राहुन बँकेने संबंधीत संस्थेशी आवश्यक तो सामंजस्य करार करण्याचे बंधनकारक राहील. या करारात आवश्यकतेनुसार वरील बाबींस पुरक असलेल्या अतिरीक्त तरतुदींचा समावेश करता येईल.

६. नागरी सहकारी बँकांचे कामकाज सक्षम व कार्यक्षम सेवकवर्गाच्या माध्यमातून पार पाडण्यासाठी तसेच सर्वसाधारण जनतेने या बँकात गुंतवणूक केलेल्या ठेवी संरक्षित ठेवण्याचा दृष्टीने सदर निर्देश लोकहितार्थ महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम ७९ (अ) (१) अन्वये देण्यात येत आहेत. सदर आदेश तात्काळ प्रभावाने लागू करण्यात येत असून या निर्देशांनुसार भरतीप्रक्रिया पारदर्शकपणे, नि:पक्षपातीपणे व विश्वासार्हपणे पार पाडण्याची जबाबदारी सर्व संबंधीत नागरी सहकारी बँकांची राहील.

या निर्देशांनुसार नागरी सहकारी बँका भरतीप्रकिया राबवतील यासाठी सहकार आयुक्त व निबंधक तसेच संबंधीत बँकांचे निबंधक यांनी संनियंत्रण ठेवावे. तसेच सदर निदेशांचे पालन बँकेने न केल्यास बँकेच्या संबंधीत निबंधकांनी बँकेवर महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम ,१९६० व महाराष्ट्र सहकारी संस्था नियम ,१९६१ अन्वये उचित कार्यवाही करावी.

सदरचा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२११११५८११६१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2019.01.21 12:28:53 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
३. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
४. नागरी सहकारी बँक (सर्व)
५. निवड नस्ती ७-स.